अधिदान व लेखा कार्यालयातून
**रोख्र देय**

‘ क ’ वर्ग नगरपालिकांच्या (२०,००० पेक्षा जास्त लोकसंख्या) पाणीपुरवठा योजनांसाठी आयुर्विमा महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी अनुदान.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.**
शासन निर्णय क्र.एलआयसी- २०११/ प्र.क्र.१३१/पापु-०४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दि. ३१ मे, २०११.

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, नगर विकास व सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमडब्ल्यूएस- १७६५ / १०१०३ / एम, दि. ८ जून १९६८.
२. शासन निर्णय, नगरविकास व सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. लोन- १०७५ / यूडी- २२, दि. २० ऑगस्ट १९७६.
३. शासन निर्णय, नगरविकास व सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमडब्ल्यूएस-१०७६/२९२/युडी-२२, दि.११फेब्रुवारी, १९७७.
४. शासन निर्णय, नगरविकास व सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. डब्ल्यूएसबी- १०७६/३१०८/यूडी-२२, दि.७ मार्च १९७७.
५. शासन निर्णय, नगरविकास व सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. लोन- १०७६ / २९७५ यूडी- २२, दि. १९ सप्टेंबर १९७८.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये ज्या " क " वर्ग नगरपालिकांची लोकसंख्या २०,००० पेक्षा जास्त आहे, अशा नगरपालिकांच्या पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी आयुर्विमा महामंडळाकडून जून १९६८ नंतर घेतलेल्या कर्जाची परतफेड पहिली ५ वर्षे शासन करेल व त्यानंतर उर्वरित कालावधीकरीता कर्जाची परतफेड नगरपालिका व शासन ५०:५० या प्रमाणात करतील. यामधील शासनाने आयुर्विमा महामंडळास परतफेड केलेली कर्ज व व्याजाची रक्कम शासनाने नगरपालिकांना दिलेले कर्ज आहे. परंतु सन- १९७७ मध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची (पूर्वीचे महाराष्ट्र पाणीपुरवठा व जलनि:सारण मंडळ) निर्मिती झ्ााल्यानंतर आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणावर टाकण्यात आल्यामुळे कर्जाचे हप्ते फेडण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान दिले जाते. संदर्भाधिन दि. ७ मार्च, १९७७ च्या शासन निर्णयान्वये आख्रून देण्यात आलेल्या पध्दतीनुसार प्रत्येक १ जून व १ डिसेंबर रोजी आयुर्विमा महामंडळास देय झालेल्या रकमांचे हप्ते महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अदा करते. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला मंजूर केलेले अनुदान कर्ज म्हणून समजण्यात येते. संदर्भाधिन दि. ८ जून १९६८ च्या शासन निर्णयानुसार आयुर्विमा महामंडळाकडून नगरपालिकांनी ज्या अटी व शर्तीनुसार कर्ज घेतले होते त्याच अटी व शर्तीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पुढील २० वर्षात नगरपालिकेकडून कर्जाची वसुली करते.

वित्त विभागाने लेखानुदान सन-२०११-१२ अनुसार मालिका निधी विवरणपत्र अर्थ वितरण प्रणाली उपलब्ध करुन दिली आहे. प्रस्तुत लेखा अनुदानान्वये माहे मे, २०११ महिन्यामध्ये उपलब्ध करुन दिलेली उक्त प्रयोजनार्थ तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

सन-२०११-१२ करीता या प्रयोजनासाठी रु. ६,१३,२५,०००/- एवढी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयान्वये प्रस्तावनेत नमूद केलेल्या वित्तिय आकृतिबंधाच्या अधिन राहून आयुर्विमा महामंडळास दि. १.६.२०११ रोजी देय असलेल्या मुद्दलाची रू. २,५१,४९,५५७/- व व्याजाची रू. १,८८,९१,३०६/- अशी एकूण रु.४,४०,४०,८६३/- (रुपये- चार कोटी चाळीस लाख्र चाळीस हजार आठशे त्रेसष्ठ फक्त) एवढी तरतूद महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास मुक्त करण्यात येत आहे. सदर ख्रर्च मागणी क्र. वाय- ६, “ ६२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता यासाठी कर्जे, ०१- पाणी पुरवठा, १९०- स्थानिक संस्था, नगरपालिका, इत्यादिंना कर्जे-- (०१) स्थानिक संस्था, नगरपालिका, इत्यादिंना कर्जे-- (०१) (०१) पाणीपुरवठा योजनांसाठी आयुर्विमा महामंडळाकडून उभारलेल्या कर्जाच्या परतफेडीसाठी नगरपालिकांना कर्जे - (६२१५ ०० ९४) ५५, कर्जे व आगाऊ रकमा ” या लेख्राशिर्षाख्रालील सन २०११-१२ या वर्षाच्या अनुदानातून भागविण्यात यावा.

२. या लेख्राशिर्षांतर्गत वेळोवेळी मंजूर केलेल्या कर्जाची जी रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दि. १.६.२०१० रोजी, शासन लेख्याप्रमाणे संबंधित नगरपालिकांकडून वसूल केलेली रक्कम रु.६३,९३,१५०/- (रुपये- त्रेसष्ठ लाख्र त्र्याण्णव हजार एकशे पन्नास फक्त) इतकी असणे अपेक्षित होते. परंतु सदर वसुली होत नसल्याने सदर वसुलीबाबतचा शासन लेख्रा ख्रालीलप्रमाणे आहे:

| अ.क्र. | लेख्राशिर्ष | वसुलीची रक्कम |
|---|---|---|
| १ | ६२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता यांसाठी कर्जे | |

| | | |
|---|---|---|
| | ०१ पाणीपुरवठा १९०, सार्वजनिक क्षेत्रे व उपक्रमासांठी कर्जे<br>(१) नागरी पाणीपुरवठा योजनेसाठी कर्जे (६२१५ ५०२२/००) | ० |
| २ | ००४९ व्याजाच्या जमा रक्कमा<br>१९१ स्थानिक संस्थाकडून मिळालेले व्याज ( ००४९ ००४३/००) | ० |
| | **(एकूण)** | ० |

अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांस असे निर्देश देण्यात येत आहेत की, **वरील रक्कमाचे समायोजन २०११-१२ च्या शासकीय लेख्यात करण्यात यावेत.** तसेच उपरोक्त मंजूर रक्कम रु. ४,४०,४०,८६३/- (रुपये- चार कोटी चाळीस लाख चाळीस हजार आठशे त्रेसष्ठ फक्त) मधून वर नमूद केलेली वसुलीची रक्कम रु.६३,९३,१५०/- (रुपये- त्रेसष्ठ लाख त्र्याण्णव हजार एकशे पन्नास फक्त) **वजा न करता** रु. ४,४०,४०,८६३/- (रुपये- चार कोटी चाळीस लाख चाळीस हजार आठशे त्रेसष्ठ फक्त) **एवढीच पूर्ण रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देण्यात यावी.**

४. उक्त मंजूर रक्कम प्राप्त करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी श्री. शं. धे. चव्हाण यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उप सचिव, श्री. दु. र. चंद्रिकापुरे, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांस सादर करावे. ही मंजूर रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळास भरणा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील. **सदर रक्कम इसीएस प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.**

५. या निर्णयान्वयें मुक्त केलेल्या अनुदानाच्या संदर्भात खालील बाबीचीं पूर्तता करावी.

अ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने वरील मंजूर रक्कमेच्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

ब) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने वरील मंजूर रक्कम ज्यासाठी मंजूर करण्यात आलेली आहे त्याच विनिर्दिष्ट प्रयोजनासाठीच खर्च करावी.

क) वरील ‘ अ ’ व ‘ ब ’ मधील शर्तीची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल १/२, मुंबई / नागपूर यांना लेखा परिक्षणाकरीता नोंद वहया व लेखे तपासण्याचा अधिकार राहील आणि महालेखापालांना त्यांचे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून प्राधिकरणाने संपूर्ण मदत व सुविधा पुरवावी.

ड) मुंबई वित्तीय नियम १९५९ जोडपत्र-२२ मधील, नियम क्र. २ अनुसार महालेखापाल यांनी मागणी केल्यास त्यांच्या तपासणीकरिता या खर्चासंबंधी सर्व कागदपत्रे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने उपलब्ध करुन द्यावीत.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२६/१ /व्यय-३, दिनांक १६ मे २०११ अन्वये त्यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांच्या संगणक संकेतांक- २०११०५३११६१४१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-

**( उ. म. मदन )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स , नरिमन पॉईंट, मुंबई
२. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
३. कार्यकारी संचालक , (गुंतवणुक) भारतीय आयुर्विमा महामंडळ , मुंबई
४. महालेखापाल-१, मुंबई (लेखापरिक्षा )
५. महालेखापाल-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल-२, नागपूर (लेखापरिक्षा )
७. महालेखापाल-२, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखा अधिकारी, बांद्रा, मुंबई
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
११. वित्त विभाग ( अर्थसंकल्प-१९ / अर्थोपाय / अर्थबळ /
12. निवडनस्ती ( पापु-०४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग